सन २०२१-२२ करीता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी विकास विभागाच्या कार्यक्रम खर्चाच्या योजनांतर्गत बांधील बाबींकरीता निधी वितरण.
(मागासवर्गीय कल्याण-वेतन)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०२१/ प्र.क्र.०२ / कार्यासन-६
मंत्रालय, विस्तार इमारत, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०३ नोव्हेंबर, २०२१.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२. शासन निर्णय, आ.वि.वि., क्र. बीयुडी-२०२१/ प्र.क्र.०१/ कार्यासन-६, दि.०७.०४.२०२१, दि.२८.०४.२०२१, दि.१७.०५.२०२१, दि.१.०६.२०२१, दि.२.०६.२०२१, दि.१५.०६.२०२१, दि.१८.०६.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.५.०७.२०२१, दि.४.०८.२०२१,दि.१.०९.२०२१ व दि.३०.०९.२०२१

**प्रस्तावना :-**

आर्थिक वर्ष सन २०२१-२२ करीता वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये खर्चाचे प्राधान्यक्रम ठरवून वित्तीय उपाययोजना करण्यासंदर्भातील मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. यास अनुसरून वित्त विभागाने अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण (BEAMS) वितरण प्रणालीवर वेळोवेळी उपलब्ध करुन दिल्यानुसार आदिवासी विकास विभागाच्या कार्यक्रम खर्चांतर्गत समाविष्ट योजनांच्या ०१-वेतन व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) बाबींकरीता अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ६० टक्के मर्यादेत संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये संबंधित नियंत्रक अधिकारी यांना निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

आता वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार कार्यक्रम खर्चाच्या योजनांतर्गत ०१-वेतन व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या बाबींकरीता अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५% या मर्यादेतील वाढीव तरतूद संबंधित नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी विकास विभागाच्या “कार्यक्रम खर्च” अंतर्गत मागणी क्र.टी-५ या खाली सोबतच्या विवरणपत्रातील रकाना क्रमांक-२ मध्ये नमूद योजनांतर्गत ०१-वेतन व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या बाबींकरीता अर्थसंकल्पीत तरतुदींच्या रकाना क्रमांक-५ प्रमाणे निधी संबधित नियंत्रक अधिकारी यांना वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा.

३. विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी स्तंभ क्र.५ मध्ये दर्शविलेल्या तरतुदी त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित कराव्यात. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.९७५/व्यय-१४,दि.०३.११.२०२१ अन्वये दर्शविलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२१११०२१७३९१३८८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c4f0e8608020fad0064f5bd3c615be5666dc0af54fcf5038cc18559d51a472ba, pseudonym=DDE30B7B971C12AC5E78F6BE2C672CA11B7A98CE, serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2021.11.03 15:37:46 +05'30'

**( वि.फ.वसावे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९. सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
११. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. निवड नस्ती (का-६).

आ.वि.वि. शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.०२/कार्यासन-६, दि.०३नोव्हेंबर, २०२१ सोबतचे विवरणपत्र

(रू.हजारात)

| अ.क्र. | योजनेचे नांव | बाब/ उद्दीष्ट क्रमांक | २०२१-२२ साठीची अर्थसंकल्पिय तरतूद | सदर शा.नि.न्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद | नियंत्रक अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | मागणी क्रमांक-टी-५ | | | | |
| | २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण,०२-अनुसूचित जमातीचे कल्याण | | | | |
| १ | (०१)(०१) आदिवासी विकास आयुक्तालय - क्षेत्रीय यंत्रणांचे बळकटीकरण (कार्यक्रम खर्च) (२२२५१३९३) | ०१-वेतन | ५७५०००.०० | ८६२५०.०० | **आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक** |
| २ | (०२)(२४) अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी (कार्यक्रम खर्च) (२२२५४१२२) | ०१-वेतन | २३५२५९.०० | ३५२८८.८५ | **आयुक्त, आदिवासी, संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.** |
| ३ | (०१) (५९) आदिवासी मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय वसतीगृह (कार्यक्रम खर्च) (२२२५डी७२५) | ०१-वेतन | ११०००००.०० | १६५०००.०० | **आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक** |
| ४ | (०१)(६०) आश्रमशाळा समुह (कार्यक्रम खर्च) (२२२५ डी७३४) | ०१-वेतन | ८००००००.०० | १२०००००.०० | **आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक** |
| ५ | (०१)(७३)स्वयंसेवी संस्थांना आश्रमशाळा व मुलगोद्योत्तर आश्रमशाळा चालविण्यासाठी सहाय्यक अनुदाने (कार्यक्रम खर्च) (२२२५ एफ१२९) | ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) | १००००००००.०० | १५००००००.०० | **आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक** |
| | **एकूण-२२२५** | | **१९९१०२५९.००** | **२९८६५३८.८५** | |
| | **एकूण मागणी क्रमांक-टी-५** | | **१९९१०२५९.००** | **२९८६५३८.८५** | |